पदोन्नती

**सहाय्यक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) संवर्गातून महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा गट-अ मधील उप विभागीय अभियंता पदावर पदोन्नती व पदस्थापना.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांकः पीओजी-२०२०/प्र.क्र.३६/सेवा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: २७.१०.२०२०

## शासन आदेश

सन २०१८-१९ च्या निवडसूचीतील श्रीमती आशा जटाळ, सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) यांना, सहायक अभियंता श्रेणी - २ (स्थापत्य) संवर्गातून महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा गट-अ मधील उप विभागीय अभियंता (स्थापत्य) पदावर या आदेशान्वये तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे. पदोन्नतीनंतर श्रीमती आशा जटाळ यांची नियुक्ती कोकण-१ या महसुली विभागांतर्गत करण्यात येत आहे. **श्रीमती आशा जटाळ यांना उप विभागीय अभियंता पदावर सविस्तर पदस्थापना मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण यांनी रत्नागिरी जिल्ह्यातील रिक्त असलेल्या पदावर द्यावी.**

२. श्रीमती आशा जटाळ यांना देण्यात येणारी पदोन्नती ही, मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात करण्यात येत आहे. तसेच सदर पदोन्नती ही सामान्य प्रशासन विभागाने पदोन्नतीच्या अनुषंगाने व आरक्षणाच्या संदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

३. श्रीमती आशा जटाळ यांना देण्यात येत असलेली पदोन्नती ही निव्वळ तात्पूरत्या स्वरूपात असून, सदर पदोन्नतीच्या अनुषंगाने त्यांना उप विभागीय अभियंता या संवर्गात जेष्ठता मिळणार नाही. तसेच आवश्यकता भासल्यास अशी तात्पुरती पदोन्नती दिलेल्या अभियंत्यांना पदावनत करण्यात येईल.

४. श्रीमती आशा जटाळ यांच्याविरूध्द, महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ मधील नियम ८ व १० खाली विभागीय चौकशी चालू अथवा प्रस्तावित /न्यायालयीन प्रकरण/FIR दाखल नसल्याच्या अटीच्या अधीन राहून सदर पदोन्नत्या देण्यात येत आहेत. तथापि, त्यांच्याविरूध्द या आदेशाच्या दिनांकास विभागीय चौकशी/ न्यायालयीन प्रकरण/FIR दाखल असल्यास त्यांच्याबाबतीत हे पदोन्नती आदेश आपोआप रद्द होतील.

५. पदोन्नत होणाऱ्या सहाय्यक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) यांना शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/कार्या-१२, दि.२८.४.२०१५ व दिनांक १६.७.२०१५ व सुधारित अधिसूचना, दिनांक १५.६.२०१७ मधील तरतुदीनुसार विभागीय संवर्गाचे वाटप करण्यात आले आहे.

६. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण/ अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, रायगड यांना अशी विनंती करण्यात येते की, श्रीमती आशा जटाळ, सहायक अभियंता श्रेणी-२ यांना पदोन्नतीचे व सविस्तर नियुक्तीचे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून तात्काळ कार्यमुक्त करावे व नवीन नियुक्तीच्या ठिकाणी कमीतकमी पदग्रहण अवधी घेऊन रजेवर न जाता किंवा कोणत्याही प्रकारे नियुक्ती रद्द करण्याचे अभिवेदन न करता रुजू होण्याचे आदेश द्यावेत.

७. जर श्रीमती आशा जटाळ, सहायक अभियंता श्रेणी-२ या दिनांक २७.११.२०२० पर्यंत पदोन्नतीनंतर देण्यात आलेल्या सविस्तर नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाल्या नाहीत तर त्यांना पदोन्नतीमध्ये स्वारस्य नाही असे गृहीत धरुन त्यांच्या पदोन्नतीचे आदेश कसलीही नोटीस न देता रद्द करण्यात येतील. याबाबत नंतर कोणत्याही अभिवेदनाचा विचार केला जाणार नाही यांची संबधितांनी कृपया नोंद घ्यावी.

८. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांना कळविण्यात येते की, श्रीमती आशा जटाळ, सहायक अभियंता श्रेणी-२ या पदोन्नतीने देण्य़ात आलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी दिनांक २७.११.२०२० पर्यंत हजर न झाल्यास त्याबाबत शासनास कळविण्यात यावे. जेणेकरुन शासनस्तरावर पुढील कार्यवाही करणे शक्य होईल.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०२७१५४९०७०७१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Patil Swati Sachin

Digitally signed by Patil Swati Sachin
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=a08a4a756cd7e1e1ea2a6f91922d10f103cebd44790093322544672eefd3784b, serialNumber=41a9218232bbaea65861213d86d108ea7c48905da5f33dba9c8f6662cb8f9e18, cn=Patil Swati Sachin
Date: 2020.10.27 15:50:47 +05'30'

**( स्वा. स. पाटील )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई पत्राने.
२. महालेखापाल-१ / २ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
३. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,
४. अधिक्षक अभियंता व सहसंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक.

५. श्रीमती आशा जटाळ, सहायक अभियंता श्रेणी-२ यांना संबंधित मुख्य अभियंता सा.बां.प्रा.वि. यांचेमार्फत.
६. मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम (उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा. राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. राज्यमंत्री सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०.अपर मुख्य सचिव (सा.बां.) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहाय्यक , सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई.
१३.कार्यासन सेवा-१,सेवा-३,आस्थापना- १/३, सेवा-६, संगणक कक्ष, सा.बां.विभाग,मंत्रालय, मुंबई,
१४.कार्यासन सेवा-२ (निवडनस्ती) सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई.